**कृति आराखडाअंतर्गत सन २००९-१० मध्ये "तालुका बीजगुणन प्रक्षेत्रावर पायाभूत बियाणे उत्पादनासाठी पायाभूत सुविधांचे सहाय्य" ही केंद्र पुरस्कृत योजना राज्यात राबविण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- ताबिके-१२०९/प्र.क्र.७७/१-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- ९ मार्च, २०१०.**

**वाचा :-** १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. ताबिके-१२०९/प्र.क्र.७७/१-अे,दि.२९.७.२००९.
२) केंद्रीय कृषि मंत्रालयाचे पत्र क्र. ६-६/२००९/एमएम, दि. ३०.६.२००९,दि.९.७.२००९ व दि.२५.१.२०१०.
३) कृषि आयुक्तालयपुणे यांचे पत्र क्र.तासीफा/पासुस/विप्र-७/३५७/२००९,दि.९/७/२००९ व दि.९.२.२०१०.

**प्रस्तावनाः-**

कृषि आराखडाअंतर्गत सन २००९-१० मध्ये "तालुका बीज गुणन प्रक्षेत्रावर पायाभूत बियाणे उत्पादनासाठी पायाभूत सुविधांचे सहाय्य " ही केंद्र पुरस्कृत योजना रु. २००.०० लाख (रु. दोनशे लाख फक्त) इतक्या खर्चासह राज्यात राबविण्यासाठी सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून सदर योजनेसाठी रुपये १००.०० लाख इतका निधी संदर्भाधिन दिनांक २९.७.२००९ च्या शासन निर्णय अन्वये वितरीत करण्यात आला आहे. सदर योजनेकरीता उर्वरित रु. १००.०० लाख़ इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णयः-**

केंद्र शासनाने संदर्भाधिन दिनांक २५/१/२०१० च्या पत्रान्वये या योजनेकरीता दुसऱ्या हप्त्यात मंजूर केलेली रक्कम विचारात घेवून सदर योजनेकरीता रु.१००.०० लाख इतका निधी (रु.शंभर लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेला अनुदानातून भागविण्यात येवून खालील लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक डी - ३
२४०१ - पीक संवर्धन
१०३ बी बीयाणे
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(००)(२०) तालुका बीज गुणन प्रक्षेत्र बळकटीकरण - (केंपुयो)

(२४०१ ३९६८)
२१ पुरवठा व सामुग्री
२७ लहान बांधकामे
५२ यंत्रसामुग्री व साधनसामग्री

वरील निधी खर्च करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्रमांक ३४-अे/१०/व्यय-१, दिनांक २४/२/२०१० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००३०९१८१३५५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(र. ब. पुरोहित)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त(कृषि) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व संचालक व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई(२ प्रती)
कृषि व पदुम विभाग (२-अे ),मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१)(अर्थ.१३) मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती.